**राज्यात अर्थसहाय्यित/स्वयं-अर्थसहाय्यित तत्वावर कौशल्य विद्यापीठांची स्थापना करण्याच्या अनुषंगाने समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०२०/प्र.क्र.२८/अभियान-१,**
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २० फेब्रुवारी, २०२०

**प्रस्तावना** :

राज्यातील युवक-युवतींना एकात्मिक आणि समग्र स्वरूपाचे कौशल्य प्रशिक्षण देण्याकरिता पोषक वातावरणनिर्मिती करण्यासाठी राष्ट्रीय तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावरील मान्यताप्राप्त कौशल्याधारित उच्च शिक्षणाद्वारे रोजगारक्षम करुन त्यांना रोजगार/स्वयंरोजगाराच्या संधी निर्माण करण्यासाठी राज्यात अर्थसहाय्यित/स्वयं-अर्थसहाय्यित तत्वावर कौशल्य विद्यापीठांची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

राज्यातील युवक-युवतींना एकात्मिक आणि समग्र स्वरूपाचे कौशल्य प्रशिक्षण देण्याकरिता पोषक वातावरणनिर्मिती करण्यासाठी राष्ट्रीय तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावरील मान्यताप्राप्त कौशल्याधारीत उच्च शिक्षणाद्वारे रोजगारक्षम करुन त्यांना रोजगार/स्वयंरोजगाराच्या संधी निर्माण करण्यासाठी राज्यात अर्थसहाय्यित /स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर कौशल्य विद्यापीठांची स्थापना करण्याची बाब कौशल्य विकास व उद्योजकता विभाग स्तरावर विचाराधीन असून त्या अनुषंगाने खालील समिती गठीत करण्यात येत आहे.

**समिती :**

| | | | |
|---|---|---|---|
| १) | आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता | - | अध्यक्ष |
| २) | उच्च व तंत्र शिक्षण विभागाचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ३) | विधी व न्याय विभागाचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ४) | श्री.विजय खोले, माजी कुलगुरु, मुंबई विद्यापिठ | - | सदस्य |
| ५) | डॉ. श्रीमती इंदु सहानी, माजी प्राचार्य, एच.आर.कॉलेज, मुंबई | - | सदस्य |
| ६) | डॉ.श्री.उदय साळुंखे, संचालक, वेलिंगकर इन्स्टिट्युट ऑ मॅनेजमेंट डेव्हलपमेंट ॲण्ड रिसर्च, मुंबई. | | सदस्य |
| ७) | डॉ. श्रीमती सुवर्णा खरात, सह सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई. | - | सदस्य सचिव |

**<u>समितीची कार्यकक्षा</u> :**

१) कौशल्य विकाससंदर्भातील अर्थसहाय्यित, स्वयं-अर्थसहाय्यित (Self Finance) तत्वावरील कौशल्य विद्यापीठांच्या अधिनियमाचे प्रारुप तयार करणे.

२) या अधिनियमामध्ये संस्थांतर्फे सुरु असलेल्या कौशल्य विकास कार्यक्रमांना प्रमाणपत्र/पदविका/पदवी याबाबतची मान्यता देणे.

३) या अधिनियमांतर्गत स्थापना करावयाच्या अभिमत विद्यापीठांकरिता University Grants Commission (UGC) कडे प्रस्तावांची शिफारस करण्याबाबतची तरतूद करणे.

२. या संदर्भातील अहवाल समितीने १५ दिवसात शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२००२२०१५३७४४२२०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr Suvarna Siddharth Kharat

Digitally signed by Dr Suvarna Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cdf8435b14113ef43d22f63f448b2db4109f1aa98eda5f3b78841f6bc40a437b, cn=Dr Suvarna Siddharth Kharat
Date: 2020.02.20 15:40:00 +05'30'

**( डॉ.सुवर्णा खरात )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत ,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६. सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
७. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
८. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
९. सर्व समिती सदस्य
१०. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, मुंबई
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई
१३. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई
१५. व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ, मुंबई
१६. निवड नस्ती. (अभियान-१)